**मौजे तळवडे, ता. हवेली, जि. पुणे येथील त्रिवेणीनगर चौक येथून जाणाऱ्या स्पाईन रस्त्याने बाधीत होणाऱ्या रहिवांशांच्या पुनर्वसनासाठी जागा वाटप करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-पीसीएन-३०१४/प्र.क्र.१४/नवि-२२**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २५ मार्च, २०१५

**संदर्भ** :- १) पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण सभा क्र. ३०४, दिनांक ७.५.२०१३,

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण,पुणे यांचे पत्र क्र.विप्रा/भूविभाग/१६१२,दि.२४.१०.२०१३ व पत्र क्र. विप्रा/भूविभाग/ २९६९, दि.४.१२.२०१४

**-: शासन निर्णय :-**

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण सभा ठराव क्र. ३०४, दिनांक ७.५.२०१३ अन्वये, पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या मागणीच्या अनुषंगाने, मौजे तळवडे, ता. हवेली, जि. पुणे येथील त्रिवेणीनगर चौक येथून जाणाऱ्या स्पाईन रस्त्याने बाधीत होणाऱ्या रहिवांशांच्या पुनर्वसनासाठी पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस अंदाजे १.४० हेक्टर जागेचे वाटप करण्यास काही अटींच्या अधीन राहून मान्यता दिली आहे. सदर ठरावात विहित केलेल्या अटींची माहिती आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिकका, पिंपरी यांना मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, पुणे यांनी दिली असून, त्याअनुषंगाने त्यांनी प्राथमिक कार्यवाही करून संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव वरील शासनाच्या विचाराधीन होता.

२. पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण भूवाटप नियमावली, १९७३ मधील भाग ३ मधील अट क्रमांक ५ अन्वये शासनास प्रदान अधिकारात, प्राधिकरण सभा ठराव क्र.३०४, दिनांक ७.५.२०१३ मधील अटींनुसार, मौजे तळवडे, ता. हवेली, जि. पुणे येथील त्रिवेणीनगर चौक येथून जाणाऱ्या स्पाईन रस्त्याने बाधीत होणाऱ्या रहिवांशांच्या पुनर्वसनासाठी आवश्यक असलेली व पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने मागणी केलेली पेठ क्र. २ मधील बल्कलँड क्र. १ ते ४ क्षेत्र १४,७८४ चौ. मी. जागा प्रचलित निवासी दराने आकारणी करून महानगरपालिकेस थेट वाटप करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, पुणे यांनी आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांच्याकडून आवश्यक त्या बाबींची पुर्तता करून घेवून, जागा वाटपाची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२५१५४४२४३१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2015.03.25 15:55:22 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

२) मा. सचिव (नवि-२),नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

३) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे,

४) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे,

६) निवड नस्ती (कार्यासन नवि-२२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई